उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्ह्यातील करमाळा तालुक्यातील नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०२२/१३९/प्र.क्र.४८/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १४ मार्च, २०२४

**वाचा -**

१) वित्त विभाग शासन निर्णय क्र.बीजीटी-२२७६/७/बीयुडी-१४, दि.२९/१२/१९७६
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण२०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
७) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
८) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र:विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२,दि.१६/१२/२०१५
९) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
१०) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: पुनर्व-२०१७/१८१/प्र.क्र.४१/र-८, दि. ०४/०६/२०१८
११) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/ आर आर/ उपले/२५२/२०२२, दि. १७/०३/२०२२
१२) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/आर आर/उपले/२५४/२०२२, दि. १७/०३/२०२२
१३) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/ उपले/ आर आर/२२४७/२०२२, दि. २१/०९/२०२२
१४) कार्यकारी अभियंता , उजनी कालवे विभाग क्र.८ यांचे पत्र क्र. जा.क्र.उकावि-८/पुनर्व/प्रशा-६/ ६४१७/२०२२, दि. ०७/११/२०२२
१५) वित्त विभाग पत्र क्र: सूप्रमा-२०२३/प्र.क्र. ७५/अर्थ-२, दि. ०७/१२/२०२३

**प्रस्तावना-**

उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्ह्यातील करमाळा तालुक्यातील रूपये ४,२३,४३,१९०/- रकमेच्या “केत्तूर नं. २ ते पोमलवाडी पोहोचरस्ता बांधणे सा. क्र. ०/०० ते १/००” आणि “केत्तूर नं. २ ते पोमलवाडी पोहोचरस्ता बांधणे सा. क्र. १/००० ते १/५००” या २ नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. १० येथील दि. ०४/०६/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

सदर रस्त्यावरून साखर कारखान्याची वाहने वाहतूक करीत असल्याने रस्त्यावरून जाणारे नागरिक व विद्यार्थी यांना अडथळा होत आहे. तसेच या पोहोच रस्त्यावर डबल ट्रक व डबल ट्रक्टर ऊस भरून समोरासमोर आल्यास वाहन मागे-पुढे घेण्यासाठी जागा राहत नसल्याने तसेच रुंदी कमी असल्याने वाहन पलटी होण्याची शक्यता आहे. त्यामुळे जीवितहानी व आर्थिक नुकसान टाळण्यासाठी या पोहोच रस्त्याची रुंदी ७.५ मी. ऐवजी १० मी. करण्यास्तव सदर कामांच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधीन क्र. ११ व १२ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्या

अनुषंगाने सदर कामांच्या अंदाजपत्रकांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्ह्यातील करमाळा तालुक्यातील पुढील तक्त्यात नमूद २ नागरी सुविधा कामांच्या रूपये ५,५८,३५,२००/- (रुपये पाच कोटी अठ्ठावन्न लक्ष पस्तीस हजार दोनशे फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांना खालील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे-

| अ. क्र. | नागरी सुविधा कामांचा तपशील | शासन निर्णय दि. ०४.०६.२०१८ अन्वये मूळ प्रशासकीय मान्यता रक्कम रूपये | सुधारित प्रशासकीय मान्यता रक्कम रूपये |
|---|---|---|---|
| १ | केत्तूर नं. २ ते पोमलवाडी पोहोचरस्ता बांधणे सा. क्र. ०/०० ते १/०० | ३,६२,४०,०००/- | ४,७४,३४,७००/- |
| २ | केत्तूर नं. २ ते पोमलवाडी पोहोचरस्ता बांधणे सा. क्र. १/००० ते १/५०० | ६१,०३,१९०/- | ८४,००,५००/- |
| | एकूण | **४,२३,४३,१९०/-** | **५,५८,३५,२००/-** |

२. उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्ह्यातील करमाळा तालुक्यातील उपरोक्त तक्त्यात नमूद २ नागरी सुविधा कामांची अंमलबजावणी करताना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतच्या संदर्भाधीन क्र. १० येथील शासन निर्णय दि. ०४/०६/२०८ मधील अटी व शर्तीचे पालन करावे. प्रस्तुत प्रकरणी सदर २ नागरी सुविधा कामांना खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता विभागाने घ्यावी.
२) सदर नागरी सुविधा कामे करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे ,वित्तीय मर्यादा , ,विहित निविदा कार्यपद्धती अनुसरणेआवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पूर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी प्रकल्प यंत्रणेची राहील.
३) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबीनिविदा विषयक क्षेत्रिय , अशा प्रकरणाची तपासणी .निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी प्रकल्प यंत्रणेची राहील.

३. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन, तसेच व्यय अग्रक्रम समितीने दि. २८.११.२०२३ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी निविदेनुसार कामे तात्काळ सुरु करावेत व नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा

अहवाल (Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाच्या कालावधीत कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार “मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (कार्यक्रमांतर्गत) (दत्तमत)” या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१४१९२६३६१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI
JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2024.03.14 19:35:42 +05'30'

**( संजय जगताप )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे.
२. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सोलापूर.
३. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे.
४. अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर.
५. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
९. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), सोलापूर.
१०.वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-२/६, मंत्रालय,मुंबई-३२.
११.नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२.महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय,मुंबई ३२.
१३.निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.